**केंद्र शासन पुरस्कृत पब्लिक प्रायव्हेट पार्टनरशिपद्वारे शासकीय औ.प्र.संस्थांचा दर्जावाढ करणे या योजनेंतर्गत समाविष्ट औ. प्र. संस्था व संस्था व्यवस्थापन समिती यांच्या प्रगतीचे मूल्यमापन करण्यासाठीच्या गुणवत्ता निकषांना (Key Performance Indicators) मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**कौशल्य विकास व उद्योजकता विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः पीपीपी -२०१८/प्र.क्र.९१/१८/व्यशि-५,**

मंत्रालय विस्तार भवन, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०५ फेब्रुवारी, २०१९.

वाचा :

१) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय, क्र. आयटीआय २००७/ (१६२/०७) / व्यशि २, दिनांक ३१.१२.२००७.
२) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय, क्र. पीपीपी-२०१०/(१५४/ १०)/ व्यशि ५, दिनांक २७.०९.२०१०.
३) डी.जी.ई.टी., नवी दिल्ली यांचे पत्र क्र.DGET-३५(१३९६) /Guidelines/२०१४-NIC, दिनांक २१.०७.२०१४.
४) राज्य सुकाणू समितीच्या दिनांक ०४.०३.२०१७ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.
५) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य यांचे पत्र क्रमांक १८/ पीपीपी /२०१८/२५, दिनांक ०३.०३.२०१८.
६) राज्य सुकाणू समितीच्या दिनांक ०९.०३.२०१८ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.
७) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य यांचे पत्र क्रमांक १८/ पीपीपी /KPI/२०१८/४४, दिनांक २१.०४.२०१८.
८) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य यांचे पत्र क्रमांक १८/पीपीपी /KPI/२०१८/१७३, दिनांक १०.१०.२०१८.
९) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य यांचे पत्र क्रमांक १८/पीपीपी /KPI/२०१८/२१८, दिनांक २०.१२.२०१८.

**प्रस्तावना :-**

देशातील१,३९६ औद्योगिक प्रशिक्षण संस्थांचा दर्जावाढ पब्लिक प्रायव्हेट पार्टनरशिप (Public Private Partnership) द्वारे करण्याबाबत केंद्र शासनाच्या निर्णयानुसार उच्च व तंत्रशिक्षण विभाग, शासन निर्णय दिनांक ३१.१२.२००७ अन्वये सदर योजना राज्यात राबविण्यास मान्यता देण्यात आली असून सन २००७-२००८ ते सन २०११-१२ या वर्षामध्ये सदर योजने अंतर्गत राज्यातील २५० औ. प्र. संस्थांचा दर्जावाढ टप्प्याटप्प्याने करण्यात आला आहे. सदर योजनेंतर्गत अंतर्भूत होणा-या औद्योगिक प्रशिक्षण संस्थांच्या प्रगतीचे मूल्यमापन करण्यासाठीच्या निकषांना (Key Performance Indicators) संदर्भ क्र.२, दि.२७.०९.२०१० च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. केंद्र शासनाच्या, डीजीईटी, नवी

दिल्ली यांच्या संदर्भ क्र.३, दिनांक २१.०७.२०१४ च्या पत्रान्वये सदर योजनेच्या अंमलबजावणीबाबत मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आलेल्या आहेत. त्यानुसार सुधारीत गुणवत्तेचे निकष (Key Performance Indicators) निश्चित करण्यात आलेले आहेत. तसेच सदर दिनांक २१.०७.२०१४ च्या पत्रान्वये सुधारीत संस्था विकास आराखड्यास (Institute Development Plan) (IDP) मंजूरी देण्यात आलेली असून सदर IDP मध्ये सुधारीत गुणवत्तेचे निकष समाविष्ट करण्यात आलेले आहेत.

पब्लिक प्रायव्हेट पार्टनरशिप योजनेचा सर्वंकष आढावा घेण्यासाठी आयोजित राज्य सुकाणू समितीच्या दि.०४.०३.२०१७ रोजी झालेल्या बैठकीमध्ये "शासन निर्णय दि.२७.०९.२०१० अन्वये शासनाने KPI ला मान्यता दिलेली आहे. DGT ने सुधारीत KPI ठरविलेले असल्याने वरील शासन निर्णयात DGT च्या सुचनेप्रमाणे शुद्धीपत्रकाद्वारे बदल करण्यात यावा", असा निर्णय घेण्यात आलेला आहे. तसेच, राज्य सुकाणू समितीने दि.०९.०३.२०१८च्या बैठकीमध्ये केंद्र शासनाने विहित केलेल्या सुधारीत IDP च्या नमुन्यात सुधारीत IDP तयार करण्यास मंजूरी दिलेली आहे. यानुषंगाने केंद्र शासन पुरस्कृत पब्लिक प्रायव्हेट पार्टनरशिपद्वारे शासकीय औ.प्र.संस्थांचा दर्जावाढ करणे या योजनेंतर्गत अंतर्भूत होणा-या औद्योगिक प्रशिक्षण संस्थांच्या प्रगतीचे मूल्यमापन करण्यासाठीच्या सुधारीत गुणवत्ता निकषांना (Key Performance Indicators) मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

उपरोक्त पार्श्वभूमीवर आता केंद्रशासन पुरस्कृत योजनेंतर्गत खाजगी सहभागाने (पब्लिक प्रायव्हेट पार्टनरशिप द्वारे ) राज्यातील शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थांचा दर्जावाढ करणे या योजनेंतर्गत समाविष्ट औद्योगिक प्रशिक्षण संस्था व संस्था व्यवस्थापन समिती यांच्या प्रगतीचे मूल्यमापन करण्यासाठीच्या प्रपत्र अ मध्ये विहित करण्यात आलेल्या गुणवत्ता निकषांना (Key Performance Indicators) खालील अटींच्या अधीन राहून सदर शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

१) राज्य सुकाणू समितीने संस्थानिहाय सुधारीत IDP ला मंजूरी दिलेल्या तारखेपासून सुधारीत गुणवत्ता निकष लागू राहतील.
२) संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णय , दिनांक २७.०९.२०१० अन्वये निर्गमित करण्यात आलेले गुणवत्ता निकष पूर्वीप्रमाणेच लागू रहातील. त्याव्यतिरिक्त उक्त सुधारीत गुणवत्ता निकष लागू होतील.
३) सुधारीत गुणवत्ता निकषांच्या अनुषंगाने केंद्र शासनाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना विचारात घेऊन आवश्यक कार्यवाही करण्याची जबाबदारी संबंधित प्रादेशिक सहसंचालकांची राहील.

२. गुणवत्ता निकषांनुसार संबंधित औद्योगिक प्रशिक्षण संस्था व संस्था व्यवस्थापन समिती यांच्या प्रगतीचा त्रैमासिक आढावा घेऊन अहवाल राज्य सुकाणू समितीस तसेच शासनास सादर करण्याची जबाबदारी संचालक (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई यांची राहील. त्यानुसार ज्या औद्योगिक प्रशिक्षण संस्थाची प्रगती समाधानकारक रहाणार नाही, त्याबाबतीत केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार आवश्यक कार्यवाही करून अहवाल राज्य सुकाणू समितीस सादर करण्याची जबाबदारी संचालक (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण) यांची राहील.

सदर शासन निर्णय शासनाच्या संकेतस्थळावर www.maharashtra.gov.in यावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१९०२०५१५१६५२५६०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Sakharam Dina Kharat

Digitally signed by Sakharam Dina Kharat
DN: CN = Sakharam Dina Kharat, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Skill Development and Entrepreneurship Department
Date: 2019.02.05 15:19:46 +05'30'

**सोबत:- प्रपत्र 'अ'**

**( स.दि.खरात )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत**

१. महासंचालक, प्रशिक्षण, कौशल्य विकास व उद्योजकता मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली.
२. मा. मंत्री, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. राज्यमंत्री, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.प्रधान सचिव, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक.
५. संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६. आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता संचालनालय, सी.बी.डी, बेलापूर, नवी मुंबई.
७. सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण प्रादेशिक कार्यालय, मुंबई / पुणे / नाशिक / औरंगाबाद / अमरावती / नागपूर .( संचालनालयामार्फत )
८. सर्व जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी ( संचालनालयामार्फत ) .
९. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर.
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर.
११. संबंधित प्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था .( संचालनालयामार्फत )
१२. विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. निवड नस्ती ( व्यशि ५ )

कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, शासन निर्णय क्रमांक: पीपीपी -२०१८/ प्र.क्र.९१/१८/व्यशि-५ , दिनांक ०५ फेब्रुवारी, २०१९ सोबतचे

प्रपत्र 'अ'

**Target Key Performance Indicators (KPIs)**

| Sr. No. | Key Performance Indicators** | Base line (year of IDP revision) | Target | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | Year 1 (*) | | Year 2 (*) | | Year 3 (*) | | Year 4 (*) | | Year 5 (*) | |
| | | | Present Target | Revised Target | Present Target | Revised Target | Present Target | Revised Target | Present Target | Revised Target | Present Target | Revised Target |
| 1 | % of candidates appearing in the examination vis-a-vis intake capacity including supernumerary seats | | | | | | | | | | | |
| 2 | % of number of candidates passing out vis-a-vis candidates appearing in the examination | | | | | | | | | | | |
| 3 | % of passed out students employed/ self employed within one year of pass out. | | | | | | | | | | | |
| | % of employed | | | | | | | | | | | |
| | % of self employed | | | | | | | | | | | |
| 4 | Revenue Generation*** | | | | | | | | | | | |
| 5 | Re-affiliation, if due by **** | | | | | | | | | | | |

*Please mention the financial year

**KPI no. 3 will be applicable with effect from August 2015.

Initial bench mark for KPI no. 1 & 2 is 70% which should be taken upto 95% in next few years. Initial bench mark for KPI no. 3 ,is 50% for wage employment and 70% for overall employment.

***Target for revenue generation is Rs.5 lakh, Rs.10 lakh and Rs.15 lakh for the years 2014-15, 2015-16 and 2016-17 respectively.

****Present target of re-affiliation if due is by August, 2015.

Sakharam Dina Kharat

Digitally signed by Sakharam Dina Kharat
DN: CN = Sakharam Dina Kharat, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Skill Development and Entrepreneurship Department
Date: 2019.02.05 15:20:05 +05'30'

(स.दि.खरात)
उप सचिव, महाराष्ट्र शासन.